(१४ पैकी शासन निर्णय क्र.२)
**फौजदारी खटल्यातील सिध्दापराध प्रमाण वाढविण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत. सर्व शासकीय अभियोक्ते संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांच्या नियंत्रणाखाली आणणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डीपीपी-२०१२/प्र.क्र.१०/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १२ मे, २०१५

**प्रस्तावना :**

न्यायालयात फौजदारी स्वरुपाचा गुन्ह्याबाबत दाखल दोषारोपपत्रावर खटला चालविण्याकरिता शासनाकडून सरकारी अभियोक्ता/ अतिरिक्त सरकारी अभियोक्ता/ विशेष सरकारी अभियोक्ता नियुक्त केले जातात. फौजदारी प्रक्रिया संहिता, १९७३ मध्ये सन २००६ साली संशोधन / सुधारणा करुन त्यामध्ये कलम २५ (ए) जोडण्यात आलेले आहे. सदर कलम २५ (ए) च्या पोटकलम (५) अन्वये, मा. उच्च न्यायालयामध्ये कलम २४ (१) खाली नियुक्त केलेले सरकारी अभियोक्ता, अतिरिक्त सरकारी अभियोक्ता किंवा २४ (८) खाली नियुक्त केलेले विशेष सरकारी अभियोक्ता हे संचालक, अभियोग संचालनालय यांच्या अधिनस्थ राहतील. तसेच कलम २५ (ए) चे पोटकलम (६) अन्वये सत्र न्यायालयामध्ये कलम २४ (३) अन्वये नियुक्त केलेले सरकारी अभियोक्ता अतिरिक्त सरकारी अभियोक्ता व कलम २४ (८) अन्वये नियुक्त केलेले विशेष सरकारी अभियोक्ता हे उप संचालकांच्या अधिनस्थ राहतील अशी तरतूद आहे. प्रत्येक उप संचालक हे संचालक, अभियोग संचालनालय यांच्या अधिनस्त राहतील आणि संचालक, अभियोग संचालनालय हे गृह विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली राहतील. राज्यामध्ये सदर कायद्याची अंमलबजावणी आतापर्यंत झालेली नसल्यामुळे कलम २४ अन्वये सर्व सरकारी अभियोक्ता, अतिरिक्त सरकारी अभियोक्ता व विशेष सरकारी अभियोक्ता हे सध्या विधि व न्याय विभागाच्या अधिनस्थ आहेत. सदर बाब कायद्याशी सुसंगत नसून दोषारोपसिद्धीचे प्रमाण वाढविण्यासाठी सर्व अभियोक्ते एकाच नियंत्रणाखाली ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

फौजदारी प्रक्रिया संहिता, १९७३ मध्ये सन २००६ साली झालेल्या संशोधन / सुधारणाच्या अनुषंगाने, फौजदारी स्वरुपाचा गुन्ह्याबाबत शासनाकडून नियुक्त करण्यात येत असलेल्या सरकारी अभियोक्ता/ अतिरिक्त

सरकारी अभियोक्ता/ विशेष सरकारी अभियोक्ता एकाच नियंत्रणाखाली आणण्याकरिता पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

(अ) राज्यातील मा. उच्च न्यायालयात व त्यांच्या खंडपीठांमध्ये नेमलेले सरकारी अभियोक्ता, अतिरिक्त सरकारी अभियोक्ता , विशेष सरकारी अभियोक्ता हे संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांच्या अधिनस्थ राहतील.

(आ) प्रत्येक जिल्ह्यामध्ये नियुक्त केलेले सरकारी अभियोक्ता, अतिरिक्त सरकारी अभियोक्ता आणि सहाय्यक सरकारी अभियोक्ता हे उप संचालक, अभियोग संचालनालय यांच्या अधिनस्थ राहतील.

२. उपरोक्त शासन निर्णयानुसार पुढील प्रशासकीय कार्यवाही संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांनी तातडीने करावी.

३. महाराष्ट्र विधि अधिकारी (नियुक्ती, सेवाशर्ती व मानधन) नियम-१९८४ Maharashtra Law Officers (Appointment, Condition of Service and Remuneration), Rules, १९८४ व शासकीय विधिविषयक कामकाजाचे नियम, १९८४ (Rules for the conduct of Legal Affairs of Government,१९८४) यामध्ये आवश्यक त्या सुधारणा विधि व न्याय विभागाने तातडीने कराव्यात.

४. महाराष्ट्र शासन कार्यनियमावली, २६ जून १९७५ च्या पहिल्या अनुसूचीनुसार विभागांमध्ये करण्यात आलेल्या विषयांच्या वर्गीकरणात आवश्यक त्या सुधारणा सामान्य प्रशासन विभागाने तातडीने कराव्यात.

५. सदर शासन निर्णय विधि व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र २१०६ दि.२९/०४/२०१५ नुसार प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१२१७१४३१३५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: CN = Dattatray Santaram Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.12 19:22:39 +05'30'

**(द.सं.पाटील)**
उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय मुंबई.

३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई.

४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य

५. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई

६. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई

७. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय मुंबई.

८. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई

९. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई

१०. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई

११. सर्व पोलीस आयुक्त

१२. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र

१३. सर्व अपर पोलीस महासंचालक

१४. सर्व जिल्हाधिकारी

१५. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश

१६. सर्व पोलीस अधीक्षक

१७. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१८. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव

१९. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव

२०. उप सचिव (पोल-१०)

२१. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई

२२. सर्व कार्यासने, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई

२३. निवडनस्ती